**व्यवसाय शिक्षण विभागातील अशासकीय अनुदानित संस्थातील कर्मचाऱ्यांचे वेतन राष्ट्रीयकृत बँकेमधून वितरीत करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : व्हीओसी-२०१०/४७२/प्र.क्र.१३८/व्यशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ७ डिसेंबर, २०१०.

वाचा - १) महाराष्ट्र शासन, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक: व्हीओसी-२००९/(२२३/०९)/व्यशि-४, दिनांक २६ मे, २०१०
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र.डी.डी.ओ. १०००/प्र.क्र.१६१/कोषा-४, दिनांक १६ एप्रिल, २०१०

**प्रस्तावना :-** सध्या राज्यामध्ये व्यवसाय शिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत, माध्यमिक स्तरावरील पुर्व व्यवसायिक अभ्यासक्रम, +२ स्तरावरील व्दिलक्षी अभ्यासक्रम, उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम व महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळाचे प्रमाणपत्र व्यवसाय अभ्यासक्रम या चार मुख्य योजना शासकीय, अशासकीय अनुदानित व अशासकीय विनाअनुदानित संस्थामधून राबविण्यात येतात. यामध्ये अशासकीय अनुदानित संस्थांची संख्या १२७८ असून कर्मचा-यांच्या मंजूर पदांची संख्या ९५४३ आहे.

२. अशासकीय अनुदानित संस्थातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांचे वेतन सद्या जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालयामार्फत शासन निर्णय क्रमांक: व्हीओसी/२१९६/(६१/९६)/व्यशि-४, दिनांक ११.७.१९९७ अन्वये जिल्हा मध्यवर्ती बँकेतून/सरकारी पतपेढयांमार्फत करण्याचे आदेश असल्याने त्यानुसार या कर्मचा-यांचे वेतन जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेमार्फत देण्याची पध्दती सुरु आहे. तथापी, सध्याच्या वेतन देण्याच्या पध्दतीमध्ये अनेक अडचणी निदर्शनास आलेल्या असून कर्मचा-यांचे वेतन उशीराने होत असल्याने वेतन नियमित मिळावे याबाबत सातत्याने तक्रारी येत असतात. तसेच अशासकीय अनुदानित संस्थांतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी व त्यांच्या संघटनेने या कर्मचा-यांचे वेतन शासकीय कर्मचा-यांप्रमाणेच राष्ट्रीयकृत बँकेमार्फत देणेबाबत संचालनालयाकडे मागणी केलेली आहे.

३. त्या अनुषंगाने व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने शासनाला सादर केलेल्या दिनांक २६.५.२०१० च्या अहवालात जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेमार्फत वेतन वितरीत करण्याच्या पध्दतीमध्ये असलेल्या त्रुटी, त्यामुळे शासनाला सोसावे लागणारे आर्थिक नुकसान तसेच राष्ट्रीयकृत बँकामधील तत्पर सेवा व सोयी/सुविधा या बाबत सविस्तर विवेचन करुन अशासकीय अनुदानित संस्थांतील कर्मचा-यांचे वेतन शासकीय कर्मचा-यां प्रमाणेच १३ पैकी ८ राष्ट्रीयकृत बँकेमार्फत करण्यास परवानगी दयावी, असा प्रस्ताव शासनाला सादर केला आहे.

अशासकीय अनुदानित संस्थामधील कर्मचा-यांचे वेतन जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेमार्फत देण्यात येत असल्याने कर्मचा-यांची अवाजवी गैरसोय व शासनाचे लक्षावधी रुपयांचे नुकसान होत असल्याचे निदर्शनास आले असून राष्ट्रीयकृत बँकांच्या अत्याधुनिक सेवासुविधांमुळे कर्मचा-यांना त्यांचे

वेतन वेळेत आणि सुलभतेने मिळण्याची शक्यता विचारात घेवून राज्य शासकीय कर्मचा-यांप्रमाणे राष्ट्रीयकृत बँकामार्फत वेतन अदा करण्याची कार्यप्रणाली सुरु करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासननिर्णय-**

प्रस्तावनेत नमूद बाबी विचारात घेवून उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या नियंत्रणाखालील व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रमाकडील अशासकीय अनुदानित संस्थामधील कर्मचा-यांचे वेतन यापूढे राष्ट्रीयकृत बँकामार्फत अदा करण्यास शासनमान्यता देण्यात येत आहे.

"वेतन राष्ट्रीयकृत बॅका मार्फत प्रदान" या योजनेच्या अंमलबजावणीसाठी खालील प्रमाणे कार्यवाही करण्यास याव्दारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) राज्यातील सर्व व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या नियंत्राणाखालील व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रमाकडील अशासकीय अनुदानित संस्थांचे वेतन देण्यासाठी प्रशासकीय सोईच्या ठरणा-या जिल्हयातील कोणत्याही एका राष्ट्रीयकृत बँकेच्या शाखेमध्ये चालु खाते (करंट खाते) सुरु करावे. संबंधित कार्यालय प्रमुखांनी त्यांच्या आहरण व सवितरण अधिका-यांचे प्राधिकार महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ नियम १५६ अन्वये त्यांचे अधिपत्याखालील इतर अधिका-यास प्रदान केले असतील तर संबंधित बँकेच्या शाखेला तसे कळवून त्या बँकेच्या शाखेतील खात्यातून उपरोक्त व्यवहार करण्यास प्राधिकृत केलेल्या संबंधित अधिका-याचे नाव स्वाक्षरी संबंधित बँकेच्या शाखेकडे पाठवावी. ज्यावेळी अशा अधिका-यांच्या गैरहजेरीत आहरण व संवितरण अधिका-याच्या नावाने उघडलेल्या खात्यातुन व्यवहार करण्यासाठी पर्यायी प्रशासकीय व्यवस्था केली जाईल त्या-त्या वेळी बँकेच्या संबंधित शाखेस हा बदल कळवावा व संबंधिताची नमुना स्वाक्षरी पाठविण्यात यावी.

२) प्रत्येक कर्मचा-यांने आहरण व संवितरण अधिका-याने निश्चित केलेल्या राष्ट्रीयकृत बॅकेत किंवा त्या बॅकेच्या शाखेत खाते उघडणे आवश्यक आहे.

३) अधिदान व लेखा कार्यालय / कोषागार कार्यालयाने काढलेल्या धनादेश संबंधित राष्ट्रीयकृत बॅकेत जमा केल्यानंतर आहरण व वितरण अधिकारी यांनी सादर केलेल्या कर्मचा-यांच्या यादीनुसार कर्मचा-यांच्या त्याच बॅकेच्या अथवा त्या बॅकेच्या इतर शाखेत खात्यावर तात्काळ जमा करण्यात यावे.

४) संस्थास्तरावर करावयाच्या वजाती उदा. बॅकेच्या वसुली इ. करण्यासाठी प्रत्येक संस्थेच्या प्राचार्य/ मुख्याध्यापक यांचे नवे खाते उघडण्यात यावे व वजातीची रक्कम या खात्यावर जमा करण्यात यावी.

५) प्रत्येक महिन्याच्या पहिल्या आठवडयात, बॅक पासबुक व कार्यालयीन रोखवही (कॅश बुक) याचा मेळ घेणे सुकर व्हावे म्हणून बँक खात्यावर मागील महिन्यात झालेल्या व्यवहारांचे एक विवरणपत्र संबंधित बँकेच्या शाखेने संबंधित कार्यालयास पाठविणे आवश्यक आहे.

६) मार्च महिन्याचा अपवाद वगळता इतर सर्व महिन्यासाठी अधिदान व लेखा कार्यालय/कोषागारे कार्यालयाकडून आहरण व संवितरण अधिकारी यांना देण्यात येणारे वेतन व भत्याचे धनादेश, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : टिआरडब्ल्यु-१३८८/प्र.क्र.१३७/८८/कोषागारे-४, दि.११ जुलै, १९८८ अन्वये संबंधित विभागाच्या वेतन व भत्ते देय असलेल्या दिवसापेक्षा तीन कामाचे दिवस आधी देय दर्शवून देण्यात यावेत.

तसेच संबंधित कार्यालयाने त्यांच्या वेतन व भत्याची मासिक देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार कार्यालये यांनी ठरवून दिलेल्या वेळापत्रकानुसार सादर करावीत. आवश्यकती देयके वेळीच सादर करणे व अधिदान व लेखा कार्यालय/कोषागार कार्यालयाकडून तत्संबंधीचे धनादेश वेळेवर प्राप्त करुन घेणे या कार्यवाहीस विलंब झाल्यास वेतन व भत्याचे मासिक प्रदानात होणा-या विलंबाची जबाबदारी संबंधित कार्यालयाची असेल.

७) अधिदान व लेखा कार्यालय/कोषागार कार्यालयाने कर्मचा-यांच्या मासिक वेतन व भत्याचा एकत्रित एकच धनादेश संबंधित राष्ट्रीयकृत बँकेत कार्यालयाचे आहरण व संवितरण अधिकारी यांच्या पदनामाने काढावा व सदर धनादेश रेखांकित व केवळ पैसे घेण्याच्या खाती (क्रॉस्ड व अकौन्ट पेयी) असा काढण्यात यावा.

८) नियंत्रक अधिकारी /प्रादेशिक कार्यालयातील लेखाधिकारी यांनी प्रत्येक कार्यालयाच्या निरीक्षणाचे वेळी बँक खात्यातील व्यवहारासंबंधी सखोल तपासणी करावी व सदर बँकेचे व्यवहार विहित पध्दतीने झाल्याची वैयक्तिक खात्री करावी.

९) या योजनेनुसार संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांनी राष्ट्रीयकृत बँकेमधील कोणत्याही एका बँकेच्या शाखेमध्ये डिडिओ अकौन्ट (आहरण व संवितरण अधिकारी खाते) उघडतांना त्या अधिका-यास कोणतीही रक्कम डिपॉझिट अथवा ठेव म्हणून भरणा करावी लागणार नाही. तसेच, कर्मचा-यांच्या खात्यावर वेतन व भत्याचे प्रदान या योजनेखाली करण्यात आल्या नंतर कर्मचा-यांस कोणतेही कमिशन आकारण्यात येणार नाही या व इतर लाभ मिळण्यासाठी आहरण व संवितरण अधिका-यांने निवडलेल्या बँकेशी उचित करार करावा.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणकीय सांकेतांक क्रमांक २०१०१२०७१९४५०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

**( शोभा वि. पत्की )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत :

१) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई-१
२) प्र.संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई-१
३) सह /उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, सर्व प्रादेशिक कार्यालये
४) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पूर्व), मुंबई.
५) महालेखापाल - II (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई-१
६) महालेखापाल - II (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई-१
७) संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी ( व्यवसाय शिक्षण संचालनालयामार्फत )
८) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
९) व्यशि-२ अर्थसंकल्प, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई
१०) निवड नस्ती